**राज्य उत्पादन शुल्क विभागातील गट-अ व गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांकः इएसटी-१२१५/प्र.क्र.२८/राउशु-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ३० मे, २०१५

वाचा :-

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) शासन अधिसूचना क्र. इएसटी-१२१३/प्र.क्र.१७१/राउशु-१, दि. ०६.०१.२०१४.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही- २०१४/व्हीआयपी-२८४/ प्र.क्र.३६२/१२, दि.२६.११.२०१४.

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदलीचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतूद करण्याकरीता महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ अंमलात आणण्यात आला आहे. या अधिनियमातील कलम ६ मधील परंतुक २ व कलम ७ यामधील तरतुदी विचारात घेऊन बदली करण्यास सक्षम प्राधिकाऱ्याचे बदल्यांचे अधिकार, त्याच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे प्रत्यार्पित करण्याची कार्यवाही करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने दि. २६.११.२०१४ च्या परिपत्रकान्वये सूचना दिलेल्या आहेत. त्यानुषंगाने राज्य उत्पादन शुल्क विभागातील गट-अ व गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ६ मधील परंतुक २ व कलम ७ यामधील तरतुदीनुसार राज्य उत्पादन शुल्क विभागातील गट-अ व गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार पुढीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचा संवर्ग | बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्यात आलेला प्राधिकारी | |
|---|---|---|---|
| | | नियमीत बदली | विशेष बदली |
| १ | अप्पर आयुक्त | मा.मंत्री (राउशु) | मा.मुख्यमंत्री |
| २ | सह आयुक्त | मा.मंत्री (राउशु) | मा.मुख्यमंत्री |
| ३ | उप आयुक्त (व.श्रे) | मा.मंत्री (राउशु) | मा.मुख्यमंत्री |
| ४ | उप आयुक्त (क.श्रे.) | प्रधान सचिव (राउशु) | मा.मुख्यमंत्री |
| ५ | अधीक्षक | प्रधान सचिव (राउशु) | मा.मुख्यमंत्री |
| ६ | उपअधीक्षक | प्रधान सचिव (राउशु) | मा.मुख्यमंत्री |
| ७ | निरीक्षक | प्रधान सचिव (राउशु) | मा.मुख्यमंत्री |
| ८ | सहायक आयुक्त | आयुक्त, राउशु | मा.मुख्यमंत्री |
| ९ | गट-क | आयुक्त, राउशु | मा.मंत्री (राउशु) |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०११७३०५८७८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ankush S Gharge

Digitally signed by Ankush S Gharge
DN: CN = Ankush S Gharge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.06.01 17:35:19 +05'30'

**(अं.शा.घार्गे)**

सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव (राउशु), गृह विभाग, जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
६. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. सर्व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य
८. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.